**मा. उच्च न्यायालयाचे सेवा निवृत्त न्यायाधीश यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या चौकशी समितीस मुदत वाढ देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जहिया २०१२/प्र.क्र.८० (भाग-७) का-१६

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई
दिनांक: २० नोव्हेंबर ,२०१४

वाचा -

१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, जहिया २०१२/प्र.क्र.८० (भाग-४ ) का-१६, दिनांक १५.४.२०१४

२) सदस्य सचिव, चौकशी समिती, नाशिक यांचे क्रमांक ICO/६१ of २०१४,दि.२५.९.२०१४ चे पत्र

प्रस्तावना -

जनहित याचिका क्र.१५३/२०१२ मध्ये नमूद करण्यात आलेल्या प्रत्येक आरोपाची शहानिशा करुन त्यात काही वित्तीय वा इतर अनियमतिता झाली आहे किंवा कसे याची तपासणी करणे तसेच संबंधीताविरुध्द कारवाई करणेची शिफारस करणे व भविष्यात अशा घटना घडू नयेत याकरीता उपाययोजना सुचविणे यासाठी शासन निर्णय , आदिवासी विकास विभाग, दिनांक १५ एप्रिल,२०१४ अन्वये श्री. एम.जी. गायकवाड, मा. सेवा निवृत्त न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय यांच्या अध्यक्षतेखाली ५ सदस्यीय चौकशी समिती गठित करण्यात आली असून चौकशी आयोग अधिनियम, १९५२ (१९५२ चा ६०) याच्या कलम ४ मधील अधिकार सदर समितीस दिनांक २९.४.२०१४ च्या अधिसूचनेन्वये प्रदान करण्यात आले आहेत. या समितीचे कामकाज दिनांक २५.७.२०१४ पासून प्राथमिक स्वरुपात सुरु झालेले आहे. सदर समितीची मुदत दिनांक १५.१०.२०१४ रोजी पर्यंत असल्याने व चौकशी समितीस अद्याप चौकशीच्या अनुषंगाने बरीच कामे करावयाची असल्याने सदस्य सचिव, चौकशी समिती, नाशिक यांनी त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील दिनांक २५.९.२०१४ च्या पत्रान्वये चौकशी समितीस दिनांक १५.१०.२०१४ च्या पुढे आणखी ६ महिन्याच्या कालावधीकरीता मुदतवाढ देणेबाबत कळविले असल्याने त्यानुषंगाने सदर चौकशी समितीस आणखी पुढील ६ महिन्याच्या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जनहित याचिका क्र.१५३/२०१२ बहिराम पोपटराव मोतीराम विरुध्द महाराष्ट्र शासन या न्यायालयीन प्रकरणी अर्जदाराने याचिकेत नमूद केलेल्या प्रत्येक आरोपाची शहानिशा करुन त्यात काही वित्तीय वा इतर अनियमतिता झाली आहे किंवा कसे याची तपासणी करणे तसेच संबंधीताविरुध्द कारवाई करणेची शिफारस करणे व भविष्यात अशा घटना घडू नयेत याकरीता उपाययोजना सुचविणे करीता श्री. एम.जी. गायकवाड, मा. सेवा निवृत्त न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय यांच्या अध्यक्षतेखाली शासन निर्णय क्रमांक आदिवासी विकास विभाग, जहिया २०१२ /प्र.क्र.८० (भाग-४ ) का-१६, दिनांक १५.४.२०१४

अन्वये गठित केलेल्या ५ सदस्यीय चौकशी समितीची मुदत दिनांक १५.१०.२०१४ रोजी संपृष्टात येत असल्याने सदर समितीस दिनांक १५.१०.२०१४ पासून पुढील ६ महिन्याच्या कालावधीकरीता या शासन निर्णयाद्वारे मुदत वाढ देण्यात येत आहे.

सदर चौकशी समितीने करावयाची कामे, तिची कार्यकक्षा, तिच्या जबाबदा-या व कर्तव्ये त्याचप्रमाणे अटी व शर्ती ( Terms of Reference ) या संदर्भातील दिनांक १५.४.२०१४ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणेच राहतील.

सदर समितीसाठी होणारा खर्च मागणी क्र.टि-५, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -०२, अनुसूचित जमातीचे कल्याण -७९६, आदिवासी क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०१) आदिवासी विकास आयुक्तालय ( २२२५-१३९३ ) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व सदर खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ८६५/व्यय १४, दिनांक १९.११.२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१४११२०१५५६०८३८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Khandare Mahadeo S

Digitally signed by Khandare Mahadeo S
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=MTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Khandare Mahadeo S
Date: 2014.11.21 16:51:07 +05'30'

**( म.सो. खंडारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री ( आवि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री ( आवि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. मा. श्री. एम.जी.गायकवाड, सेवा निवृत्त न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, (गृह ), मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (वित्त ) विभाग, मंत्रालय, मुंबई

९. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.प्रधान सचिव (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई
११.प्रधान सचिव ( विधी व न्याय विभाग) मंत्रालय, मुंबई
१२.प्रधान सचिव (उर्जा) मंत्रालय, मुंबई
१३.सचिव, (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.श्री. बिपीन श्रीमाळी, (भाप्रसे), व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, राज्य विद्यूत पारेषण कंपनी, मर्या. मुंबई
१५.श्री. प्रवीण सांळुखे, विशेष पोलिस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र , नाशिक
१६.आयुक्त, आदिवासी विकास, म.रा. नाशिक
१७. सदस्य सचिव, चौकशी समिती, नाशिक
१८. श्री. सुनिल भोसले , सहसंचालक (वित्त), महाराष्ट्र राज्य एडस नियंत्रण सोसायटी, वडाळा, मुंबई
१९.महालेखापाल ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
२०.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
२१.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२२.जिल्हा कोषागार अधिकारी , नाशिक
२३.सर्व उप सचिव/अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२४.सर्व कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२५.निवड नस्ती का-१६